जामदा बंधाऱ्यावरील डाव्या व उजव्या तिरावरील विविध जलद्वारांची दुरुस्ती जामदा बंधाऱ्यावरील नवीन सेवाव्दार निर्मिती कामासाठी प्रशासकीय मंजूरीच्या कामासाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/( ५०६/१४)/ सिंव्य(कामे)**
मंत्रालय, मुंबई
तारीख: ०९ /०९/२०१४

वाचा

**१) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र क्र मुअ/तापाविम/प्रशा६/४०८९दिनांक२२.८.२०१४**

**२) महाराष्ट्र शासन जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र प्रमा २०१३/(५९३/२०१३) सिंव्य(कामे) दि.२९.१.२०१४**

प्रस्तावना

दिनांक २९.१.२०१४ च्या शासन निर्णयाअन्वये उपरोक्त विषयातील अंदाजपत्रकात दुरुस्ती कामे माहे जून २०१४ मध्ये चालू करण्यात आली व आपत्कालीन द्वारे गाळ्यात सोडून सेवाद्वारे दुरुस्तीसाठी बाहेर काढण्यात आली. सेवाद्वारे बाहेर काढल्यानंतर त्यांच्या तपासणीअंती खालील बाबी निदर्शनास आल्या असल्याचे नमुद करण्यात आले आहेत. १)द्वारकळी ( Gate Leaf ) पुर्णत: गंजुन खरा़ब झालेली आहे. २) द्वारकळीचे हॉरीझान्टल गर्डर गंजुन त्यास व द्वारकळी (skin plate) छिद्रे पडलेली आहेत. ३) व्हर्टीकल सपोर्ट गंजून खरा़ब झालेले आहेत. काही तुटुनही पडलेले आहेत. ४) रोलर, रोलर पिन, बेअरींग, स्टेमरॉड इ घटक भाग गंजुन निकामी झालेले आहेत. द्वारकळीची स्थिती पहाता त्यास पॅचवर्क करुन वेल्डींग करणे शक्य नाही. म्हणुन दोन्ही कार्यकारी अभियंतांनी (स्थापत्य व यांत्रिकी) दि. ३१/०७/२०१४ रोजी प्रकल्पास, भेट देवुन कामांची पहाणी केली व धरण सुरक्षिततेच्या दृष्टीने आवश्यकता पडताळुन संदर्भ क्र.६ अन्वये निरीक्षण टिप्पणीद्वारे आवश्यक शिफारसी केल्यास, तसेच दुरुस्ती कामे थांबलेली असल्यामुळे दि.०१ /०८/२०१४ रोजी मा. अधीक्षक अभियंता तथा प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण जळगांव यांचे सोबत बैठक घेऊन त्यांना सद्यस्थितीबाबत अवगत करण्यात आले. मा.अधिक्षक अभियंता तथा प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव यांनी दोन्ही कार्यकारी अभियंता यांच्या शिफारशीप्रमाणे कामे करुन घेण्याच्या सुचना दिल्या असल्यामुळे त्याअनुषंगाने नवीन द्वारकळी व इतर घटक भाग निर्मिती कामांचे विशेष दुरुस्तीचे अंदाजपत्रके यांत्रिकी विभागाने केलेली आहे. सदर दुरुस्तीस विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचे विचार शासनाचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयाव्दारे जामदा बंधाऱ्यावरील नवीन सेवाव्दार निर्मिती कामासाठी दुरुस्ती कामासाठी रु.१४९.६७ लक्ष (कामावरील खर्च रु १३६.०६ लक्ष व रु १३.६१ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१)शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी

२)सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

३) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्ततेबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (miles stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार miles stone साध्य

करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

४) उपरोक्त शासन निर्णय संदर्भ क्र २ वरील हयापूर्वी प्रशासकीय मान्यता प्रदान केलेल्या कामांचा वाव वगळून सक्षम स्तरावर आवश्यक कामांचा अंतर्भाव करुन, सदर प्रशासकीय मान्यता अंतर्गत व मर्यादेत तांतित्रक मान्यता प्रदान करावी.

५) विशेष दुरुस्तीचे काम यांत्रिकी संघटनेकडून करुन घेण्यात यावे.

६) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा यासाठी भाग भांडवली अंशदान( १०)( ०२) तापी पाटबंधारे विकास महामंडळास( ४७०१ जे १४९) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र ५२ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे .

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग- पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे..

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१२३८५४१३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.09.09 12:34:49 +05'30'

**कि.ल.संखे**
**शासनाचे कक्ष अधिकारी**

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई

५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०. स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१३. मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक
१५. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१६. आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव
२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नाशिक
२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक
२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/( ५०६ /१४)/ सिंव्य(कामे) दिनांक ९. ९.२०१४ चे प्रपत्र

**परिशीष्ट**

| अ.क्र | बाब | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १) | जामदा बंधाऱ्यावरील डाव्या कालव्यावरील सेवाव्दारे ३ नग व सिंचन विमोचक व्दारे ४ नगांची दुरुस्ती करणे व उच्चालकाचे विद्युतचलितीकरण करणे | १३६.०६ |
| २ | अनुषंगिक खर्च १० टक्के | १३.६१ |
| | एकूण | १५७.१६ |

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.09.09 12:35:13 +05'30'

कि.ल.संखे

**शासनाचे कक्ष अधिकारी**